राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सुधारित ५१ गावे (ता.मुक्ताईनगर, जि.जळगांव) येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु- २०२०/प्र.क्र. ९२/पापु १७**

**०७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल,**

**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१**

**दिनांक: १५ ऑक्टोबर, २०२०.**

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१८/प्र.क्र.१७८/पापु-१९, दिनांक ०८/०३/२०१९.

२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश, दिनांक १३/०६/२०१६.

३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश दिनांक १५/०९/२०२०.

४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र.मुअ/नाशिक/तांशा-३/२१४/२०२०, दिनांक १२/०२/२०२०.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सुधारित ५१ गावे (ता.मुक्ताईनगर, जि.जळगांव ) येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी अंदाजपत्रकास मुळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तथापी, सदर योजनेच्या कामात तांत्रिक बदल व अन्य कारणामुळे खर्चात वाढ झाली. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार, मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.४ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सुधारित ५१ गावे ( ता.मुक्ताईनगर, जि.जळगांव) येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ५०४०.८७ लक्ष (ढोबळ) (अक्षरी रुपये पन्नास कोटी चाळीस लक्ष सत्यांऐंशी हजार फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे तातडीने पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगांव यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत /जिल्हा परिषद /महाराष्ट्र जीवन प्राधिकरण जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषद/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

**५. १०० टक्के नळ जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन ग्रामपंचायतीकडून करण्यात यावे.**

**६. जल जीवन मिशनच्या दृष्टीने आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणीची नोंद तपासणे व यापूढे देण्यात येणाऱ्या नळ जोडणीबाबत IMIS वर माहिती वेळेत नोंदविणे आवश्यक आहे.**

**७. योजना चालविण्यासाठी १० टक्के रक्कम ग्रामपंचायतीकडे जमा ठेवावी.**

८. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद/महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

९. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद/महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

१०.हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

११.प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषद / महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

०२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु. ३१४.८३ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी चौदा लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) हा मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( राज्य हिस्सा ) ( २२१५ २०७१ ) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००८१५२४४४२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Adhikrao Bapu Budhe

Digitally signed by Adhikrao Bapu Budhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, serialNumber=6dd8309934e3a186f9e32ab2ed268a322fa2805ecbd838d076066aa8f4668bc0, cn=Adhikrao Bapu Budhe
Date: 2020.10.16 16:33:03 +05'30'

**( अ.बा.बुधे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
२) मा.सभापती / उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
३) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

४) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
६) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८) जिल्हाधिकारी, जळगांव.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव.
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
११) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१२) संचालक, जल जीवन मिशन, बेलापूर, मुंबई.
१३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.
१४) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.
१५) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१६) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक.
१७) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, जळगांव.
१६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, जळगांव.
१७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगांव.
१८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,१३,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-०१.
२३) निवड नस्ती कार्यासन पापु-१७.